वितरण आदेश क्र.३
(सन २०१४-१५)

नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेत राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून करावयाच्या कामांस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.
( सन २०१४-१५ ) योजनांतर्गत

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :टिआरएन -२०१४/१५६२/प्र.क्र.२४२/१४/१२-अ,**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २६ मार्च,२०१५

**संदर्भ :-** .१ सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी१०१४/प्रक्र. ९१ /२०१४/२५, दि.९ एप्रिल २०१४
२. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७.४.२०१४.
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१४/प्र. क्र.११०/अर्थ ३, दि.१ जुलै २०१४.
४.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र: टीआरएन-२०१४/प्र.क्र.११/१४/१२-अ, दि.२०.५.२०१४
५. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्रक्र. ९१ /२०१४/२५, दि.३ जुलै,२०१४
६. अध्यक्ष, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी तथा विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्र.नामप्रप्र/कावि/५०५/२०१४, दि.३.१२.२०१४
७. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र. क्र.८५/अर्थसंकल्प ३, दि.२ जानेवारी, २०१५ व दि.९ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी **"मागणी क्र. ए-०४ २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान योजनांतर्गत"** या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.१०४९.९९ लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये करण्यात आली असून संदर्भाधीन क्रमांक २ च्या शासन परिपत्रकान्वये तरतूदीच्या अनुषंगाने, एप्रिल ते जुलै, २०१४ या ४ महिन्यांसाठी एकूण रु.३५०.०० लाख एवढे लेखा अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले होते. तसेच, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर **रु. ३,४९,९९,२८० /-(अक्षरी रूपये तीन कोटी,एकोणपन्नास लाख,नव्व्याण्णव हजार दोनशे ऐंशी फक्त)** एवढे योजनेतर सहायक अनुदान खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आले होते. त्यापैकी संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये रामेती पुणे, नाशिक प्रबोधिनी व वनामती, नागपूर या संस्थांना अनुक्रमे रु.६५.००/- लाख,रु. ६२.००/- लाख व रु. ५३.०५/- लाख अशा एकूण **रु.१,८०,०५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी, ऐंशी लाख, पाच हजार फक्त )** एवढया योजनेतर सहायक अनुदानास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन, निधी वितरित करण्यात आला आहे. आता संदर्भाधीन क्र. ५ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र. ७ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७५% च्या मर्यादेत, रु.७,८७,४९,२५०/-(अक्षरी रूपये सात कोटी,सत्त्याऐंशी लाख,एकोणपन्नास हजार,दोनशे पन्नास फक्त) इतके सहायक अनुदान खर्चाकरिता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर

तरतूदीपैकी या संस्थेस यापूर्वी दि. २०.५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये, संस्थेच्या विविध कामांच्या अनुषंगाने रु.६२.००/- लाख एवढया सहायक अनुदानास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन, निधी वितरित करण्यात आला आहे. तथापि, आता उर्वरित कामाकरिता, निधी अभावी प्रबोधिनीचे काम अपूर्ण अवस्थेत असल्याचे नमूद करुन संदर्भाधीन क्र.६ च्या पत्रान्वये उपायुक्त , नाशिक विभाग , नाशिक यांनी प्रबोधिनीतील,

१. नालंदा व तक्षशिला प्रशिक्षण हॉलमधील भिंतींना वुडन पॅनेलिंग व जमिनीला पीव्हीसी फ्लोरिंग करणे,

२. तसेच, २८ निवासी खोल्यांना पीव्हीसी शिटचे फ्लोरिंग, खिडक्यांना फ्लायप्रूफ मेश बसविणे, संचालक कक्षाची दुरूस्ती करणे, मलनिस्सारण पाईपलाईन दुरूस्ती करणे व इतर पूरक कामे.

३. नाशिक महसूल प्रबोधिनीच्या इमारतीस बाहेरुन रंगरंगोटी करणे,

या विविध कामांकरिता सहायक अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) उपविभाग, नाशिक यांनी सक्षम अधिकारी म्हणून व कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग यांच्याकडून साक्षांकित केलेल्या, तसेच मंजूर आराखडयानुसार तयार केलेल्या एकूण रु.२८,७०,३९९ /- (अक्षरी रूपये अठ्ठावीस लाख, सत्तर हजार, तीनशे नव्याण्णव फक्त)एवढया रकमेच्या कामांसाठी प्राथमिक अंदाजपत्रकान्वये निधीची मागणी केली आहे. संस्थेच्या उपरोक्त तीन कामांस प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

प्रस्तुत कामांचे अंदाजपत्रक मंत्रालयीन सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले असून, प्रस्तुत कामांच्या अंदाजपत्रकांची एकूण रु. २८,१९,७००/- (अक्षरी रूपये अठ्ठावीस लाख, एकोणवीस हजार, सातशे फक्त)इतकी बाबनिहाय रक्कम खालीलप्रमाणे निश्चित केली आहे.

| अ.क्र. | कामाचे नांव | अंदाजित किंमत | छाननीअंती किमंत |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | नाशिक महसूल प्रबोधिनीच्या इमारतीमधील नालंदा व तक्षशिला प्रशिक्षण हॉलमधील भिंतींना वुडन पॅनेलिंग व जमिनीला पीव्हीसी फ्लोरिंग करणे | रु. १३,००,२३६.०० | **रु.१२,८८,०००.००** |
| २ | नाशिक महसूल प्रबोधिनीच्या इमारतीमधील २८ निवासी खोल्यांना पीव्हीसी शिटचे फ्लोरिंग, खिडक्यांना फ्लायप्रूफ मेश बसविणे,संचालक कक्षाची दुरूस्ती करणे, मलनिस्सारण पाईपलाईन दुरूस्ती करणे व इतर पूरक कामे | रु.१०,७०,१६३.०० | **रु.१०,६०,०००.००** |
| ३ | नाशिक महसूल प्रबोधिनीच्या इमारतीस बाहेरुन रंगरंगोटी करणे | रु.५,००,०००.०० | **रु.४,७१,७००.००** |
| | एकूण | रु.२८,७०,३९९.०० | **रु.२८,१९,७००.००** |

उपरोक्त तक्त्यातील संस्थेच्या बाबनिहाय कामांच्या अनुषंगाने किंमत निश्चित करतांना सार्वजनिक बांधकाम विभागाकडून खालील बाबी नमूद करण्यात आल्या आहेत.

१. अंदाजपत्रके सहायक अभियंता, सा.बां.दक्षिण उपविभाग, नाशिक यांनी तयार केली आहेत व सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग नाशिक यांनी साक्षांकित केलेली आहेत.

२. अंदाजपत्रके सन २०१३-१४ च्या दरसूचीवर तसेच दरसूचिबाहय बाबींकरिता बाजारदराचे कोटेशन विभागाकडून मंजूर करुन त्यावर आधारित आहेत.

३. अंदाजपत्रकात सेंटेंज चार्जेस ४ टक्के याप्रमाणे तरतूदी योग्य करण्यात येत आहेत तर दरसूचीतील वाढीची तरतूद वगळण्यात येत आहे.

४. (अ) काम सुरु करण्यापूर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तूविशारदांकडून मंजुरी घेऊनच काम सुरु करावे.

(ब) नूतनीकरणाच्या सदर कामांस उपभोक्त्या खात्याची सहमती गृहीत धरण्यात येत आहे.

(क) दरसूचिबाहय दरांना संबंधित अधिक्षक अभियंता यांचेकडून मंजूरी घ्यावी.

वरीलप्रमाणे आवश्यक सुधारणा व दुरुस्त्या करुन व बाब क्र. ४ (अ) (ब) (क) मधील अटींच्या अधीन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने, प्रस्तुत कामासाठी रु.२८,१९,७००/-( अक्षरी रुपये अठ्ठावीस लाख, एकोणवीस हजार,सातशे फक्त ) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

२. त्यानुसार नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक या संस्थेंच्या इमारतीतील विविध कामानुसार परिच्छेद क्र.१ मधील तक्त्यातील रकाना क्र.४ नुसार निश्चित केलेल्या एकूण रु. २८,१९,७००/-( अक्षरी रुपये अठ्ठावीस लाख, एकोणवीस हजार,सातशे फक्त ) इतक्या रकमेच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केलेल्या वरील परिच्छेद क्र.१ मधील, बाब क्र. ४ (अ) (ब) व (क) च्या अटींच्या अधिन राहून, तसेच वित्त विभागाच्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन, अनुक्र. ४, परिच्छेद क्र.२७ (२) आणि भाग पहिला, उपविभाग ५, अ. क्र. १०, परिच्छेद १३४ नुसार प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय शक्तीचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र. ६ खालील अटींच्या अधीन राहून याव्दारे प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. **"ए-०४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००-००३-प्रशिक्षण ००-१०-राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान"** या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर, काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र विहित वेळेत शासनास सादर करावे.

५. आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ) नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी यांनी महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना आणि शासनास तातडीने सादर करावे.

६. उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, लेखापरीक्षा- महाराष्ट्र १, मुंबई यांना राहतील आणि त्याकरिता संबंधित संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या मान्यतेने अनुक्रमे अनौ.संदर्भ क्र.२७/इमारती-३ दि.१३.१.२०१५, अनौ.संदर्भ क्र.८७/१४४३, दि.१२.०३.२०१५ व अनौ.संदर्भ क्र.२५४/१५/व्यय-४, दि.१७.३.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३२६१३१८०७१३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GAD,CID - 916982, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=da026e85ae8cbb4e3c2acdbecbbf2f6d6cb0ae6ed5c1e54483490119ee0456ad, cn=PATIL PRATIBHA MADHAV
Date: 2015.03.26 16:19:58 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. मा. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
३. मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. मा. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
५. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
६. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे,
७. विभागीय आयुक्त तथा अध्यक्ष, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक.
८.संचालक, नाशिक महसूल प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक
९. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ), मंत्रालय, मुंबई-३२,
१० वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२,
११. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५,
१२. निवड नस्ती.